**सेवा रूग्णालय, कसबा बावडा, जि.कोल्हापूर येथील विविध इमारत बांधकामांच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता.**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१५/ प्र.क्र.११५/ आरोग्य-४.

मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: ३० जुन, २०१५.

**वाचा**

१) सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये ( राज्यस्तर ),आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांकः संआसे/कक्ष-३/ टे-६/ कसबाबावडाबांधकाम/ ३-४१५९-६०/ १५, दि.६.०४.२०१५.

**शासन निर्णय**

सेवा रूग्णालय, कसबा बावडा, जि.कोल्हापूर येथील विविध बांधकामांची एकूण रूपये ७५,३४,४५७/- (अक्षरी रूपये पंच्याहत्तर लक्ष चौतीस हजार चारशे सत्तावन्न मात्र ) इतक्या किंमतीची एकूण ३ अंदाजपत्रके प्रशासकीय मान्यता व निधी उपलब्धतेसाठी सहसंचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांच्याकडून शासनास प्राप्त झाली आहेत. सदर अंदाजपत्रक व आराखडे अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर यांनी प्रमाणित केलेली असून ते सन २०१४-१५ च्या दरसूचीवर आधारीत आहेत. तांत्रिक छाननीअंती या बांधकामांच्या एकूण ३ अंदाजपत्रकांच्या तक्त्यात नमूद केल्यानुसार एकूण रूपये ७४,६४,५८४/- ( अक्षरी रूपये चौऱ्याहत्तर लक्ष चौसष्ट हजार पाचशे चौऱ्याऐंशी मात्र ) इतक्या रक्कमेस खालील नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे स्वरूप | कामाची छाननीअंती रक्कम रूपये |
|---|---|---|
| १ | सेवा रूग्णालय, कसबा बावडा, जि.कोल्हापूर येथे धर्मशाळा इमारतीचे बांधकाम करणे. | २५,९८,९४३.०० |
| २ | सेवा रूग्णालय, कसबा बावडा, जि.कोल्हापूर येथे कार्यालय इमारतीचे व संरक्षक भिंतीचे बांधकाम करणे. | २७,६६,२४१.०० |
| ३ | सेवा रूग्णालय, कसबा बावडा, जि.कोल्हापूर येथे रूग्णवाहिका शेड, सिक्यूरिटी फोर्ससाठी सुरक्षा चौकी व वाहनतळाचे बांधकाम करणे. | २०,९९,४००.०० |
| | **एकूण** | **७४,६४,५८४.००** |

**अटी व शर्ती**

१) या कामांसाठी निविदा मागविण्याआधी सदर कामांकरीता सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिका-यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील

२) काम सुरू करण्यापुर्वी जागेच्या मालकी हक्काबाबतची पुर्तता करून घ्यावी.

३) निधी अर्थसंकल्पित झाल्याशिवाय कामास सुरूवात करण्यात येऊ नये. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी निधी उपलब्धतेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

४) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

सदर बांधकामांवरील खर्च खालील लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध करून देण्यात यावा.

**मागणी क्र.एच-८**

| | |
|---|---|
| ४२१०- | वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य |
| ०१- | नागरी आरोग्य सेवा ( वैद्यकीय सहाय्य) |
| ११०- | रूग्णालये व दवाखाने |
| (१) ( अ )- | पंचवार्षीक योजनांतर्गत योजना-इमारती |
| (००) (०१)- | मोठी बांधकामे ( ४२१० ००१४ ) |
| ५३- | मोठी बांधकामे |

सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनौ-२७२/ इमा-३, दि.२२.०५.२०१५ अन्वये दर्शविलेल्या सहमतीनुसार व वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-१०.०८/ प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि.१५.०५.२००९ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ येथील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१६१७३९१३२४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok T Uike

Digitally signed by Ashok T Uike
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400001, st=Maharashtra, cn=Ashok T Uike
Date: 2015.06.30 14:57:23 +05'30'

**अ.ता.उईके**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.

२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.

३. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
५. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, कोल्हापूर.
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, कोल्हापूर.
९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर.
११. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई
१२. वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
१३. अवर सचिव (अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई
१४. निवडनस्ती ( आरोग्य-४ ).